आदिवासी विकास विभागामार्फत नियुक्त श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या एकसदस्यीय समिती करीता निधी वितरण..

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ०३ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: **१८ डिसेंबर,२०१९.**

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४५/अर्थ-३, दि.०१.०४.२०१९
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
३) शासन निर्णय आ.वि.वि., क्र.जहिया-२०१७/ प्र.क्र.१६/ २०१७/ का-७, दि.२९.०९.२०१७ व दि.२८.०८.२०१९.
४) आयुक्त, आ.सं.प्र.सं. यांचे पत्र क्र.आसंप्रसं/जा/क्र./लेखा/ का-२/३८९,दि.२३.०९.२०१९

**प्रस्तावना:-**

आदिवासी विकास विभागामार्फत सन २००४ ते २००९ या कालावधीमध्ये राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांमध्ये झालेल्या गैरव्यवहारांबाबत न्या.गायकवाड समितीने शासनास सादर केलेल्या चौकशी अहवालाची छाननी करून शासनामार्फत पुढील करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात शासनास मार्गदर्शन करण्याकरीता आदिवासी विकास विभागाच्या दि.२९.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांची नियुक्ती करण्यात आली आहे. सदर नियुक्तीस विभागाच्या दि.२८.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये माहे डिसेंबर,२०१९ अखेरपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. या अनुषंगाने सदर समितीमार्फत करण्यात येत असलेल्या कामकाजासाठी तात्पुरत्या स्वरूपात मानधन तत्वावर नेमणूक केलेल्या अधिकारी व कर्मचारी यांच्या मानधन व इतर अनुषंगिक खर्चासाठी, तसेच न्या.गायकवाड समिती अहवालाच्या अनुषंगाने "क" वर्गवारीतील परिच्छेदांवरील कार्यवाही करण्यासाठी करार तत्वावर नेमलेल्या अधिकारी आणि कर्मचारी यांच्यासाठी जागा व इतर साधन सामुग्री साठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आदिवासी विकास विभागामार्फत नियुक्त श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या एकसदस्यीय समितीकरीताच्या अनुषंगिक खर्चासाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ अंतर्गत आदिवासी विकास आयुक्तालय **(लेखाशीर्ष २२२५ १३९३), १३- कार्यालयीन खर्च या बाबीखाली पुनर्वितरणाद्वारे रु.१००.०० लाख (अक्षरी एक कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभाग प्रमुखांनी/नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिका-यांना अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील दिलेल्या सुचनांप्रमाणे तात्काळ वितरित करावी. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय

नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन ०८.०७.२०१९ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१२१६५२०३७६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2019.12.18 17:10:19 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
४. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई -३२.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. उपसचिव (का-७) , कार्यासन अधिकारी (का-७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती (का-६)